**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, नागपूर येथे संविधान प्रस्ताविका पार्कची उभारणी करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०१८/प्र.क्र.४८/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/ प्र.क्र.१६३/बांधकामे, दि.९/१०/२०१५
२) मा.मंत्री, ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा, राज्य उत्पादन शुल्क महाराष्ट्र राज्य पत्र क्र. मा.मंत्री/ऊर्जा,ननऊ, राउशु/टिपणी/३७, दि.१६/१/२०१८ व नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र. कार्य.अभि.(प्रकल्प-२)/१०६२दि. १५/१/२०१८.
३) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - बैठक २०१६/ प्र.क्र.४७५ /बांधकामे, दि.१४/३/२०१८

प्रस्तावना :-

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत दि. ९/१०/२०१५ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीची दि. १७/०१/२०१८ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर येथे संविधान प्रस्ताविका पार्कची उभारणी करण्यास मंजूरी घेण्यात आलेली आहे. त्यानुसार सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांच्याकडून प्राप्त झालेल्या झालेल्या दि.१५/०१/२०१८ रोजीच्या प्रस्तावास अनुसरून दि. १४/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये सदर कामास रू. २,५३,००,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी त्रेपन्न लाख फक्त) इतक्या रकमेस तत्वत: मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार प्राप्त अंदापपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागास तांत्रिक छाननी साठी पाठविण्यात आले होते. सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर येथे संविधान प्रस्ताविका पार्कच्या उभारणीकरीता रू. २,५०,८०,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी पन्नास लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर येथे संविधान प्रस्ताविका पार्कच्या उभारणीकरीता रू. २,५०,८०,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी पन्नास लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी व शर्ती** :-

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयक्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा संदर्भ क्र.३ येथे नमूद दि.१४/३/२०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ नुसार कार्यकारी अभियंता तथा संमन्वयक, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून करावा.

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांना वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२६१५५२३३८६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.09.26 15:59:36 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
४) कार्यकारी अभियंता तथा समन्वयक, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
५) कार्यकारी अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
६) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
७) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०)निवडनस्ती / बांधकामे.